असा. क्र. २१ रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००२



# महाराष्ट्र शासन राजपत्र

असाधारण

प्राधिकृत प्रकाशन

गुरुवार, जानेवारी १७, २००२/पौष २७, शके १९२३

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग चार-ब

महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.

ग्रामविकास व जलसंधारण विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १७ जानेवारी २००२

### अधिसूचना

**मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८.**

क्रमांक व्हीपीएम. २०००/प्र.क्र. १३६३/२२.—मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ (१९५९ चा मुंबई ३) च्या कलम १७६ चा पोट-कलम (२) चा खंड (सव्वीस) आणि कलम १२४ च्या पोट-कलम (१) अन्वये महाराष्ट्र शासनास प्रदान करण्यात आलेल्या व त्या बाबतीत महाराष्ट्र शासनास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे, महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० यात आणखी सुधारणा करण्यासाठी पुढील नियम करीत आहे. हे नियम उक्त कलम १७६ चे पोट-कलम (४) द्वारे आवश्यक असल्याप्रमाणे यापूर्वी प्रसिद्ध करण्यात आले होते :—

१. या नियमांना महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी (पहिली सुधारणा) नियम, २००२ असे संबोधण्यात येईल.

२. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० (यापुढे यास " मुख्य नियम " असे संबोधण्यात येईल) मधील नियम ८० च्या पोट-नियम (१) मधील " आणि प्रत्येक वर्षासाठी कमाल रुपये २५० " हे शब्द, अक्षरे व अंक वगळण्यात यावे.

३. मुख्य नियमांच्या नियम १०१ मधील " आणि कमाल दरापेक्षा अधिक नाही " हे शब्द वगळण्यात यावे.

४. मुख्य नियमांच्या भाग १२ सोबत जोडलेल्या अनुसूचीतील भाग अ मध्ये,—

(अ) " कमाल " हे शब्द वगळण्यात यावे.

(ब) अनुक्रमांक १ समोरील " प्रतिवर्षी रुपये ४५० " हे शब्द, अक्षरे व अंक वगळण्यात यावे.

(क) अनुक्रमांक २ समोरील " प्रतिवर्षी रुपये १००० " हे शब्द, अक्षरे व अंक वगळण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

कुंदा गोसावी,

शासनाच्या उप सचिव.

## RURAL DEVELOPMENT AND WATER CONSERVATION DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 17th January 2002

*NOTIFICATION*

BOMBAY VILLAGE PANCHAYATS ACT, 1958.

No. VPM. 2000/CR-1363/22.—In exercise of the powers conferred by sub-section (*1*) of section 124 and clause (xxvi) of sub-section (2) of section 176 of the Bombay Village Panchayats Act, 1958 (Bom. III of 1959), and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra makes the following rules further to amend the Maharashtra Village Panchayats Taxes and Fees Rules, 1960, the same having been previously published as required by sub-section (*4*) of the said section 176, namely :—

1. These rules may be called the Maharashtra Village Panchayats Taxes and Fees (1st Amendment) Rules, 2002.

2. In rule 80 of the Maharashtra Village Panchayats Taxes and Fees Rules, 1960 (hereinafter referred to as " the principal rules "), in sub-rule (1), the words, letters and figures " and a maximum of Rs. 250 per annum " shall be deleted.

3. In rule 101 of the principal rules, the words, " and not exceeding the maximum " shall be deleted.

4. In the Schedule appended to Part XII of the principal rules, in Part A,—

(*a*) the words " Maximum " shall be deleted;

(*b*) against entry (1), the words, letters and figures " Rs. 450 per annum " shall be deleted;

(*c*) against entry (2), the words letters and figures " Rs. 1,000 per annum " shall be deleted.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

KUNDA GOSAVI,
Deputy Secretary to Government.